**श्री. अशोक पा. आव्हाड, मुख्य अभियंता (स्था.) यांची प्रतिनियुक्ती संपुष्टात आणून त्यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सेवेतून कार्यमुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन आदेश क्रमांकः मजीप्रा-११२२/प्र.क्र.४५/पापु-२३**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: ३ मार्च, २०२२

वाचा - १) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण पत्र क्र. मजीप्रा २०१९ (२९)/जवि.सांबांवि/प्रतिनि/आस्था-१, दिनांक २४.०२.२०२२

२) शासन आदेश, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.मजीप्रा-१११९/प्र.क्र.२१५/पापु-२३, दिनांक ११.०८.२०२१.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन १२, दिनांक १७.१२.२०१६.

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या. १२, दिनांक १६.०२.२०१८.

**शासन आदेश -**

या विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ११.०८.२०२१ च्या आदेशान्वये श्री. अशोक पा. आव्हाड यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामध्ये एक वर्षाच्या कालावधीसाठी मुख्य अभियंता, मजीप्रा, नाशिक या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्यात आली आहे. तथापि श्री. आव्हाड हे दिनांक १३.१२.२०२१ पासून वैद्यकीय रजेवर गेले असून ते अद्यापही रजेवर आहेत. या विभागामार्फत जलजीवन मिशन हा महत्त्वाकांक्षी प्रकल्प राबविण्यात येत असून तो मार्च, २०२४ पर्यंत पूर्ण करण्याचे उद्दीष्ट आहे. मात्र सदर प्रकल्पासंदर्भात होणाऱ्या आढावा बैठकांना श्री. आव्हाड उपस्थित राहत नसल्याचे तसेच प्रादेशिक विभाग स्तरावर कामांचा आढावा घेत नसल्याचे प्राधिकरणाने संदर्भाधीन (१) च्या पत्रान्वये नमूद केले असून श्री. आव्हाड यांना प्राधिकरणाच्या सेवेतून कार्यमुक्त करण्याची विनंती केली आहे.

३. प्राधिकरणाने नमूद केलेली कारणमिमांसा तसेच श्री. आव्हाड यांची मार्च, २०२२ मधील सेवानिवृत्ती विचारात घेता त्यांच्या सेवेचा प्राधिकरणाला कोणताही उपयोग होताना दिसून येत नाही. सक्षम प्राधिकाऱ्याने विशिष्ट कारणे नमूद करुन उदा.अनियमितता, अफरातफर, कर्तव्यच्युती इ. कारणे नमूद करुन प्रतिनियुक्तीचा कालावधी तात्काळ संपुष्टात आणण्याची तरतूद सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १७.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ५(ड)(५) मध्ये आहे. त्यानुषंगाने श्री. आव्हाड यांच्या प्राधिकरणातील सेवा या आदेशाच्या दिनांकापासून (म.नं.) संपुष्टात आणून त्यांना त्यांच्या मूळ विभागामध्ये हजर होण्यासाठी कार्यमुक्त करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०३१७३३०१४३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh
Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2022.03.03 17:53:13 +05'30'

(गणेश पवार)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

श्री. अशोक पा. आव्हाड, मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक.

प्रत:-

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
२) सहसचिव/उपसचिव (सर्व), पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
३) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
४) मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
६) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
७) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

८) कार्यकारी अभियंता (ग्रापापु), जिल्हा परिषद (सर्व)

९) कक्ष अधिकारी/अवर सचिव (सर्व), पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) निवडनस्ती, पापु-२३

प्रत माहितीस्तव,

१) मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) अप्पर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

४) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई